**महिला किसान सशक्तीकरण परियोजनेसाठी अनुसूचित जमातींना अर्थसहाय्य या योजनेसाठी आदिवासी घटक योजनेंतर्गत सन २०१६-१७ व २०१७-१८ या आर्थिक वर्षाचा प्रलंबित राज्य हिस्सा निधी सन २०१९-२० मध्ये वितरीत करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पूरक - २०२०/प्र.क्र.२२/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २६ मार्च, २०२०

**वाचा :-**

१. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.एमकेएसपी-२०१३/प्र.क्र.२६६/योजना-३, दिनांक १७ डिसेंबर, २०१३.
२. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.के-११०११/०९/२०१६/एमकेएसपी/एएपी/एमएच, दिनांक ०४ ऑगस्ट, २०१६ व दिनांक ०३.०१.२०१८.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९, दिनांक २२.०१.२०२० व दिनांक १३.०३.२०२०.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, एमएसआरएलएम, बेलापूर, नवी मुंबई यांचे क्र. एमएसआरएलएम/लेखा/४०५८ व ४०५९/२०१९, दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१९ चे पत्र.
५. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.०८/कार्यासन-६, दिनांक १८ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१६-१७ व २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रमासाठी (TSP) अर्थसहाय्य या योजनेकरिता अनुक्रमे रु.२,११,००,०००/- व रु.४,२२,०१,४९५/- इतका निधी वितरीत केलेला असून महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानच्या थेट जमा झाला आहे. त्याप्रमाणे या केंद्र शासनाच्या हिस्स्याच्या प्रमाणात समरुप राज्य हिस्स्याची अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध नसल्याने अनुक्रमे रु.१,४०,६६,६७०/- व रु.२,८१,३४,३३०/- असा एकूण रु.४,२२,०१,०००/- एवढा प्रलंबित निधी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करता येऊ शकला नाही. त्यामुळे सन २०१६-१७ व २०१७-१८ मधील सदर केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा अनुक्रमे रु.१,४०,६६,६७०/- व रु.२,८१,३४,३३०/- असा एकूण रु.४,२२,०१,०००/- एवढा प्रलंबित निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१९-२०२० मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजना आदिवासी उपयोजना क्षेत्राकरीता (TSP) राज्य हिस्सा (२५०१ ए०५७) याकरिता केलेल्या तरतूदीतून सन २०१६-१७ व २०१७-१८ मधील प्रलंबित निधी अनुक्रमे रु.१,४०,६६,६७०/- (रुपये एक कोटी चाळीस लाख सहासष्ट हजार सहाशे सत्तर फक्त) व रु.२,८१,३४,३३०/- (रुपये दोन कोटी एक्याऐंशी लाख चौत्तीस हजार तीनशे तीस फक्त) असा एकूण रु.४,२२,०१,०००/- (रुपये चार कोटी बावीस लाख एक हजार फक्त) इतका निधी आदिवासी विकास विभागाने दिनांक १८.०३.२०२० च्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात आला आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.४,२२,०१,०००/- इतका खर्च "मागणी क्र.टी-५, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१, एकात्मीकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) (१०) महिला किसान सशक्तीकरण परियोजनेसाठी अनुसूचित जमातींना अर्थसहाय्य (४०% राज्य हिस्सा) (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ ए०५७)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२०२० मध्ये केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षानिहाय / उपलेखाशीर्षानिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दीष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावे.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

७. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

८. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र संदर्भाधिन क्र.२ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२६१३५१२४९८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PANDIT KAHANDERAO JADHAV

Digitally signed by PANDIT KAHANDERAO JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f5c40942371a6969108d4d7e802129ea5f7a19f482726930e17fe1f06ad5cc76, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PANDIT KAHANDERAO JADHAV
Date: 2020.03.26 15:39:12 +05'30'

**( पं.खं. जाधव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे.
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) कक्ष अधिकारी (का.६/का.१७) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१९) मंत्रालय, मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवडनस्ती.